

खूप वर्षांपूर्वीची गोष्ट आहे.
दूरवरच्या एका देशात एक मुलगा रहात होता.
तो नवनवीन गोष्टी कशा बनवता येतील यावर सतत विचार करायचा.
त्यातल्या अनेक गोष्टी मूर्खासारख्या असायच्या.

त्या मुलाचं नाव होतं बिली.
त्याची आई त्याला सिली-बिली म्हणजे मूर्ख-बिली असंच म्हणायची.
त्याचे वडीलही त्याला सिली-बिली म्हणायचे.
हा सिली-बिली असं करायचा तरी काय?
एक दिवस त्याच्या वडिलांनी त्याला एक पॉपकॉर्नचं पाकिट दिलं.
मग बिलीनं ते पॉपकॉर्न खाल्ले असतील?
तुम्हाला काय वाटतं?
अजिबात खाल्ले नाहीत.







मग बिलीनं बराच विचार केला.
“मी मूर्ख नाही हे मी त्यांना आता दाखवूनच देतो.”
मग त्यानं पॉपकॉर्न घेतले
आणि बिया पेरतो तसे मातीत पेरले.



बिलीच्या आईला विचारलं
“तू हे पॉपकॉर्न जमिनीत का पेरतोयस बिली?”
बिली म्हणाला, “मी पॉपकॉर्न लावतोय.
मग पॉपकॉर्न उगवतील.
माझ्याकडे पोती भरभरुन पॉपकॉर्न असतील.”



“तू मूर्ख तो मूर्खच रहाणार सिली-
बिली..” आई म्हणाली.
“तू खरोखर मूर्ख आहेस.”





वडिल म्हणाले,
“बिली, तू कायम अशा
मूर्खासारख्या गोष्टी करशील.”

मग एक दिवस बिलीनं
यावर बराच विचार केला.
“मी मूर्ख नाही हे त्यांना दाखवूनच देतो.”
मग बिली घराच्या मागच्या अंगणार गेला.
त्याच्या हातात एक पातेलं होतं.
त्यात उकळतं पाणी होतं.
त्यानं दोन लाल कोंबड्यांना बोलावलं.
त्यांना गरम पाणी पाजायचा प्रयत्न केला.





बिलीची आई म्हणाली,
“तू कोंबड्यांना उकळतं गरम पाणी
का पाजतो आहेस?”
“मी कोंबड्यांना उकळतं गरम पाणी
पाजतो म्हणजे त्या साध्या अंड्यांऐवजी
उकडलेली अंडी घालतील.” बिली म्हणाला.
“सिली-बिली तू खरोखरच
मूर्खांचा शिरोमणी आहेस.. ” आई म्हणाली.





वडील म्हणाले
“बिली, मला वाटतं तू नेहमी
अशा मूर्खासारख्या गोष्टीच करणार.”

एक दिवस बिली म्हणाला,
“मी मूर्ख नाही हे
मी त्यांना दाखवतोच.
मी माझ्याहून मूर्ख व्यक्ती
शोधून आणतो.”





मग बिली घराबाहेर पडला.
आणि चालायला लागला.





मग तो एका नदीच्या तीरावर पोचला.
तिथे त्याला एक माणूस दिसला



“तुम्ही इथे काय करताय?” बिलीनं विचारलं.
तो माणूस म्हणाला “मी पाणी भरायचा प्रयत्न करतोय.”
“पण तुझ्या पातेल्याला तर खालून भोकं आहेत.”
“अगदी बरोबर..” तो माणूस म्हणाला.
“चाळणीनं पाणी भरणं खूप अवघड काम आहे.”



“मी तुम्हाला काही मदत करु का?” बिली म्हणाला.
मग बिलीनं गवत आणि ओली माती वापरुन
ती भोकं बंद केली.
“आता तुला या पातेल्यानं सहज पाणी काढता येईल.”
बिली म्हणाला.



“तुमचा खूप आभारी आहे..” तो माणूस म्हणाला. “तू खूप शहाणा आहेस आणि आयुष्यभर शहाणाच असशील.”





मग त्या माणसानं बिलीला सोन्याचं एक घड्याळ दिलं.



बिली परत चालायला लागला.
चालतच राहिला.





पुढे गेल्यावर त्याला काही माणसं भेटली.
ती खूप दु:खात होती.
“तुम्ही सगळे इतके दु:खी का आहात?” बिलीनं विचारलं.
“मी तुम्हाला काही मदत करु शकतो का?”

“आमच्यातला एक माणूस हरवला आहे.”
त्यांच्यापैकी एकजण म्हणाला.
बिली म्हणाला, “तुम्ही माणसं नीट मोजलीत का?”
“हो, आम्ही लक्ष देऊन माणसं मोजली.
आम्ही नऊ जण होतो.
पण आज सकाळी मोजलं तेव्हा दहा जण आहेत असं कळलं.
आमच्यातला एक जण हरवला आहे.”
यावर बिली म्हणाला,
“मला जरा दाखव बरं, तू कसं मोजलंस.”
मग त्या माणसानं मोजणं सुरु केलं.

“एक, दोन, तीन..”
असं करत त्यानं नऊ माणसं मोजली.
पण तो स्वत:ला धरायला विसरला.



“अरे”, बिली त्या माणसाला म्हणाला.
“तू स्वत:ला मोजायला विसरतो आहेस.”
मग परत बिली त्या लोकांना म्हणाला
“हे बघा, मी त्या हरवलेल्या साथीदाराला
शोधू शकतो.
त्याच्या बदल्यात तुम्ही मला काय द्याल?”
“आमच्याकडे जितके पैसे आहेत
ते सगळे तुला देऊ.” ते सर्वजण म्हणाले.
मग बिली म्हणाला.. “ठीक आहे.
आता मी मोजतो.”
मग त्यानं पहिल्या माणसाला मोजलं.
त्याच्या पाठीवर एकदा थोपटलं.
पुढच्या माणसाला मोजलं.
त्याच्या पाठीवर दोनदा थोपटलं.
मग त्यानं त्याच्या पुढच्या माणसाला मोजलं.
त्याच्या पाठीवर तीनदा थोपटलं.



मग बिलीनं बाकीची माणसं मोजली
चारदा थोपटलं..! पाचवेळा थोपटलं.!
सहावेळा थोपटलं,



सातवेळा थोपटलं..! आठवेळा
थोपटलं..!
नऊवेळा थोपटलं..!



दहावेळा थोपटलं





ते सर्वजण आपल्या हरवलेल्या एका
साथीदाराला
भेटून खूप खुष झाले.
“बरं झालं, कोणी हरवलेलं नाही.” असं ते
म्हणाले.

मग ते बिलीला म्हणाले

“तू खूप हुशार आहेस.
आणि आयुष्यभर हुशारीनं कामं
करशील.”
मग आपल्याकडे असलेले
सगळे पैसे त्यांनी बिलीला दिले.





मग बिली पुढे चालायला लागला.
शेवटी तो एका शहरात पोचला.

तिथे त्याला एक घर दिसलं.
“हे विचित्रच घर आहे.” बिली मनाशी म्हणाला.
“या घराला एकही खिडकी नाही.”
तेवढ्यात त्या घरातून एक माणूस
पळत पळत बाहेर आला.
त्याच्या हातात एक भांडं होतं.



मग त्या घरातली बाकीची माणसं बाहेर पळत आली.
त्यातल्या प्रत्येकाच्या हातात एक भांडं होतं.





मग ते परत घरात गेले.
ते असं सतत आतबाहेर करत होते.

“त्यांच्या हातातली भांडी तर रिकामी आहेत.” बिली पुटपुटला.

“मग ते भांडी घेऊन परत परत बाहेर का बरं येत आहेत?”

मग त्यापैकी एक माणूस पळायचं थांबला आणि म्हणाला

“हे घर खूप छान आहे. पण आत फक्त काळोख आहे.

आम्ही भांडी भरभरुन सूर्याचा प्रकाश आत घेऊन जातो. पण आतला काळोख काही मिटत नाही.

आम्हाला काही दिसतही नाही.”

“आधी त्या आतबाहेर माणसांना पळणं थांबवायला सांगा.” बिली म्हणाला.

“मग मी त्यांना मदत करायचा प्रयत्न करतो.”





मग बिली त्या माणसांना म्हणाला.
“तुम्ही एक चांगलं घर तयार केलंत.
पण तुम्ही त्याला एकही खिडकी ठेवली नाहीत.”
मग त्या माणसांनी आपल्या घराला
खिडक्या केल्या.
मग घरातला काळोख मिटला
आणि सगळं घर
सूर्यप्रकाशानं भरुन गेलं.



“अरे व्वा..” ती माणसं म्हणाली.
मग ते सर्वजण बिलीला म्हणाले
“तू खूप हुशार आहेस.
आयुष्यभर तू हुशारीनं कामं करशील.”
पुढे ते सर्वजण म्हणाले,
“कृपा करुन तू आमचा राजा हो.”
मग त्यांनी बिलीला
सोन्याचा एक मुकुट दिला.
“मला तुमचा राजा व्हायचं नाही.” बिली म्हणाला.
“पण मी हा मुकुट घेऊन घरी जाईन.
माझ्या आईवडिलांना हा मुकुट दाखवेन.”



मग बिली घरी गेला.





त्याच्या आईवडिलांनी सोन्याचा मुकुट पाहिला.
“मग ते म्हणाले.
बिली, सिली-बिली..
हा सोन्याचा मुकुट तुला कुठे मिळाला बरं?”



मग बिलीनं त्यांना सगळी कथा सांगितली.



मग त्यानं आपल्या वडिलांना
सोन्याचं घड्याळ दिलं.



आईला सगळे पैसे दिले.





पण बिलीनं सोन्याचा मुकुट स्वत:कडेच ठेवला.
तो नेहमी मुकुट घालत असे.





झाडांच्या फांद्यांना लटकून झोके घेतानाही तो मुकुट घालायचा..



इतकंच काय आंघोळ करतानाही तो मुकुट घालायचा.



..आणि झोपतानाही मुकुट घालूनच झोपायचा.

मग बिलीनं आपल्या आईवडिलांना सांगितलं.
“कृपा करुन तुम्ही मला आता सिली-बिली या नावानं
हाका मारणं बंद करा.”
“पण ते तर तुझं नावच आहे..” आई म्हणाली.
“सिली-बिली, हेच तर तुझं नाव आहे.”
“नाही माझं नाव विल्यम आहे.” बिली म्हणाला.





त्यानंतर हुशार विल्यम विचार करायला लागला..
“कदाचित.. मी अशी काही युक्ती शोधू शकेन.
ज्यामुळे गाय चॉकलेटचं दूध देईल..”

